**महाराष्ट्र राज्य औद्योगिक व गुंतवणूक महामंडळ मर्या. (सिकॉम/SICOM) या कंपनीमध्ये शासनाच्या असलेल्या भागभांडवलापैकी २३% भांगभांडवल वितरणाच्या अनुषंगाने शक्तीप्रदान समितीची स्थापना करणेबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन निर्णय क्र. संकिर्ण-२०१७/प्र.क्र. ९१ /उद्योग-८,**
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक - २८ जुन, २०१७

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र राज्य औद्योगिक व गुंतवणूक महामंडळ मर्या. (सिकॉम) ही कंपनी पूर्णत: महाराष्ट्र शासनाच्या अधिनस्त असून सदर कंपनी उद्योगांना प्रोत्साहनांचे वाटप करणे कंपन्यांचा पुनर्मुल्यांकन अहवाल सादर करणे तसेच औद्योगिक प्रकल्पांना अर्थसहाय्य करण्याचे कार्य करते. सदर कंपनीमध्ये महाराष्ट्र शासनाचे ४९% भागभांडवल असून सद्यस्थितीतील बाजारातील चढउतारामुळे महाराष्ट्र राज्य औद्योगिक व गुंतवणूक महामंडळ मर्या. (सिकॉम) ही कंपनी तोट्यात जात आहे. त्यामुळे शासनाने कंपनीमधील आपले भागभांडवल कमी करण्याचे ठरविले आहे. महाराष्ट्र राज्य औद्योगिक व गुंतवणूक महामंडळ मर्या. (सिकॉम) मधील महाराष्ट्र शासनाच्या ४९% भागभांडवलापैकी २३% भागभांडवल विकत घेण्याची इच्छूकता मे. जे. सी. फ्लॉवर्स ॲण्ड कंपनीने दर्शविली आहे. सदर भागभांडवल विकण्यापूर्वी सिकॉमचे मुल्यांकण त्रयस्त सल्लागाराकडून करण्यासाठी सदर सल्लागाराच्या नियुक्तीसाठी तसेच शासनाच्या सिकॉम मधील समभागांबाबत निर्णय घेण्यासाठी शक्तीप्रदान समितीची स्थापना करण्याची बाब शासनाच्या विचाराधिन होती. त्यानुसार शासन खालीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय-**

महाराष्ट्र राज्य औद्योगिक व गुंतवणूक महामंडळ मर्या. (सिकॉम) कंपनीमध्ये असलेले राज्य शासनाचे एकुण ४९% समभागापैकी २३% समभाग विक्रीकरण्यासाठी शासनास सल्लादेणे व पुढील रुपरेषा ठरविणे, सिकॉमचे मुल्यांकन करण्यासाठी त्रयस्त यंत्रणेची नियुक्ती करण्यासाठी खालीलप्रमाणे शक्तीप्रदान समिती गठीत करण्यात येत आहे. शक्तीप्रदान समितीची रचना खालीलप्रमाणे असेल :-

| अ.क्र. | समितीतील सदस्य | पदनाम |
|---|---|---|
| १. | मुख्य सचिव | अध्यक्ष |
| २. | अप्पर मुख्य सचिव (वित्त) | सदस्य |
| ३. | अप्पर मुख्य सचिव (उद्योग) | सदस्य सचिव |
| ४. | प्रधान सचिव (विधि व न्याय विभाग) | सदस्य |
| ५. | विकास आयुक्त (उद्योग) | सदस्य |
| ६. | व्यवस्थापकीय संचालक, सिकॉम | सदस्य |

**समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे असेल :-**

१) महाराष्ट्र राज्य औद्योगिक व गुंतवणूक महामंडळ मर्या. (सिकॉम) या कंपनीच्या मुल्यांकनासाठी त्रयस्त तज्ञ सल्लागाराची/यंत्रणेची नियुक्ती करणे.
२) सल्लागारांबरोबर सल्लामसलत करणे, त्याचे सेवाशुल्क ठरविणे, त्यांच्या सल्लाने कार्यपध्दती ठरविणे.
३) भागभांडवलाचा दर निश्चित करणे.
४) खाजगीरीत्या भागभांडवल देण्याची पध्दत निश्चित करणे.
५) ज्या संस्था सिकॉम मधील दिर्घकालीन गुंतवणूक करण्यास तयार आहेत अशा संस्थांची निवड करणे.
६) सिकॉमच्या कार्यकारी मंडळावर सदस्यांच्या नियुक्तीबाबत निर्णय घेणे.
७) सिकॉमच्या निर्गुंवणूकीकरीता मे. जे. सी. फ्लॉवर्स या कंपनीच्या प्रस्तावासह अन्य भागभांडवलदाराकडून प्रस्ताव मागणे संदर्भात निर्णय.

शक्तीप्रदान समिती महाराष्ट्र राज्य औद्योगिक व गुंतवणूक महामंडळ मर्या. (सिकॉम) कंपनीचे मुल्यांकन त्रयस्त तज्ञ सल्लागाराकडून करेल. सदर मुल्यांकन झाल्यानंतर मे. जे. सी. फ्लॉवर्स ॲण्ड कंपनीच्या प्रस्तावाची तपासणी करुन पुढील निर्णय प्रक्रीया विहित करेल.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक क्र. २०१७०६२९१२१७१०७७१० असा आहे. हा आदेश डीजीटल स्वाक्षरीने साक्षांकीत करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशांनुसार व नावाने,

Shraddha Deven Kocharekar

Digitally signed by Shraddha Deven Kocharekar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=IELD, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=189da489d797e1e6a67b7d97496ef70683916299eab51c867c5a13147d142a80, cn=Shraddha Deven Kocharekar
Date: 2017.06.29 12:15:30 +05'30'

**( श्रध्दा कोचरेकर )**
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य.
२. अप्पर मुख्य सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
३. अप्पर मुख्य सचिव (उद्योग), उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग, मंत्रालय मुंबई.
४. प्रधान सचिव, विधि व न्याय विभाग, मंत्रालय, मुंबई.
५. विकास आयुक्त ( उद्योग ), उद्योग संचालनालय, मुंबई.
६. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य औद्योगिक व गुंतवणूक महामंडळ मर्या. (सिकॉम), मुंबई.
७. महालेखापाल ( लेखा व अनुज्ञेयता / लेखापरीक्षा ), महाराष्ट्र-१/२, मुंबई / नागपूर.
८. संचालक, लेखा व कोषागारे, संगणक शाखा, नवीन प्रशासन भवन, मुंबई-३२.
९. अप्पर मुख्य सचिव, मा. मुख्यमंत्री यांचे, मंत्रालय, मुंबई.
१०. खाजगी सचिव, मा. मंत्री (उद्योग व खनिकर्म), मंत्रालय, मुंबई.
११. खाजगी सचिव, मा. राज्यमंत्री (उद्योग व खनिकर्म), मंत्रालय, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी (व्यय-१६), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवड नस्ती ( उद्योग-८).